सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात पुनर्वसन तत्वावरील स्वंयसेवी संस्थांना सहायक अनुदान वितरीत करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः कुनिका २०१४/प्र. क्र. १५४/आरोग्य -५

मंत्रालय, मुंबई ४०००३२

तारीख : १७ नोव्हेंबर, २०१४

**वाचा :**

१) सह संचालक, आरोग्य सेवा, (क्षय व कुष्ठ), पुणे यांचे क्र. ससंआसे/कुष्ठ व क्षय/ कक्ष-१०२/स्वयंसेवी संस्था/१४८९९-१४९००, दिनांक १३/६/२०१४.

२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः कुनिका२०११/प्र क्र ३२१/आरोग्य -५, दिनांक २१ मार्च, २०१२

३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थसंकल्प-३, दिनांक १ जुलै, २०१४.

**प्रस्तावना :**

उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक-२ येथील शासन निर्णयानुसार पुनर्वसन तत्त्वावरील कुष्ठरुग्णांसाठी रु.२,०००/- प्रमाणे प्रतीरुग्ण व दरमहा संस्थेने प्रत्यक्ष भरती केलेल्या रुग्णांप्रमाणे अनुदान देण्यात येते. याकरीता सन २०१४-१५ या वित्तिय वर्षाकरीता पुनर्वसन तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

पुनर्वसन तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदाने देण्यासाठी ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली रु.२,४८,००,०००/- लक्ष इतके अनुदान अर्थसंकल्पित करण्यात आले असून त्यापैकी रु.१,४८,८०,०००/- इतके सहायक अनुदान सह संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय), पुणे यांच्या कार्यालयास यापूर्वीच वितरीत करण्यात आले आहे. सदर अनुदानातून खाली दर्शविल्याप्रमाणे स्वयंसेवी संस्थांना एकूण रु.४२,४०,०००/- (रुपये बेचाळीस लक्ष चाळीस हजार फक्त) इतके सहायक अनुदान दिनांक २१ मार्च, २०१२ च्या शासन निर्णयातील अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव | कालावधी | प्रत्यक्ष हजर रुग्ण | मंजूर अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | महारोगी सेवा समिती आनंदवन वरोरा, जि.चंद्रपूर | जानेवारी २०१४ ते मार्च २०१४पर्यंत | १८०० | रु.३६,००,०००/- |
| २ | महात्मा गांधी शिक्षण संस्था चावर्दा जि. बुलढाणा | नोव्हेंबर २०१३ ते मार्च २०१४ पर्यंत | २०० | रु.४,००,०००/- |
| ३ | कुष्ठरोग निवारण समिती शांतीवन नेरे, जि. रायगड | डिसेंबर २०१३ ते फेब्रुवारी २०१४ पर्यंत | १२० | रु.२,४०,०००/- |
| | एकूण | | | रु.४२,४०,०००/- |

२. सहसंचालक (क्षय व कुष्ठ), पुणे यांनी वरील अटी पूर्ण केल्याची खातरजमा करुन संबंधित संस्थांना अनुदान अदा करण्याची कार्यवाही करावी.

३. याबाबतचा खर्च मागणी क्र.आर-१, २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य (०१)(१८) कुष्ठरोग मुक्त झालेल्या रोग्यांना पुनर्वसनासाठी अनुदाने (२२१० ०७४ ५), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३४८/व्यय-१३, दिनांक १६/१०/२०१४ व क्र.२६३/अर्थ-९, दिनांक ३१/१०/२०१४ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११७१५१८३२२११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jadhav Jayshree S

Digitally signed by Jadhav Jayshree S
DN: CN = Jadhav Jayshree S, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = PHD
Date: 2014.11.19 12:35:54 +05'30'

**(ज. सु. जाधव)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१)महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखावअनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई.
२)जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४)निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
५)संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६)सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय), पुणे
७)सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
८)वित्तविभाग, (व्यय.१३/अर्थ-९) मंत्रालय, मुंबई
९)सार्वजनिक आरोग्य विभाग, (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१०)निवडनस्ती (आरोग्य-५)